पोलीस आयुक्त, नाशिक यांचे आस्थापनेवर
परिमंडळ-२ निर्माण करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र.अेपीओ ०२१०/प्र क्र ४६६/पोल-३
मंत्रालय,मुंबई- ४०००३२
दिनांक. ०६ ऑगस्ट, २०११

**वाचा:-**१) शासन निर्णय गृह विभाग, क्र. रापासे १३०८/प्र क्र.२२८ पोल-१अ दिनांक २२ ऑक्टोबर, २००९

२) पोलीस महासंचालक, यांचे पत्र क्र पोमस २६अ/४७/नाशिक शहर /परिमंडळ-२/२०१ /२०१० दिनांक १८.०८.२०१०

३) पोलीस आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र परवाना/कक्ष-४ /पुनर्रचना/६०४३ /२०११ दिनांक २१ मे, २०११

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक २२ ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त, नाशिक यांचे आस्थापनेवर पोलीस उपायुक्त, परिमंडळ नाशिक शहर हे अतिरिक्त पद निर्माण करण्यात आले आहे. पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांचे आस्थापनेवर परिमंडळ-१ मध्ये सध्या ११ पोलीस ठाण्यांचा कार्यभार आहे. तथापि, वर नमूद केल्याप्रमाणे पोलीस उपायुक्त संवर्गातील १ नवीन पद निर्माण करण्यात आले असल्याने पोलीस उपायुक्त परिमंडळ-१ यांचेकडील कार्यभाराचे विभाजन करुन खालीलप्रमाणे परिमंडळ-२ निर्माण करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**परिमंडळ-१ व परिमंडळ-२ मध्ये येणारी पोलीस ठाणी पुढील प्रमाणे असतील.**

| अ.क्र. | परिमंडळ-१ | अ. क्र. | परिमंडळ-२ |
|---|---|---|---|
| १ | भद्रकाली पोलीस ठाणे | १ | नाशिक रोड पोलीस ठाणे |
| २ | सरकार वाडा पोलीस ठाणे | २ | देवळाली कॅम्प पोलीस ठाणे |
| ३ | पंचवटी पोलीस ठाणे | ३ | सातपूर पोलीस ठाणे |
| ४ | गंगापूर पोलीस ठाणे | ४ | अंबड पोलीस ठाणे |
| ५ | आडगाव पोलीस ठाणे | ५ | इंदीरा नगर पोलीस ठाणे |
| | | ६ | उपनगर पोलीस ठाणे |

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे. त्याचा संगणक सांकेताक २०११०८०६१०५७३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(प्र. मो. वानखडे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति - माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी.

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुं बई.-१
२) विशेष पोलीस महानिरिक्षक, नाशिक परिक्षेत्र नाशिक
३) पोलीस आयुक्त, नाशिक
४) पोलीस अधीक्षक, नाशिक
५) कक्ष अधिकारी पोल-१अ, पोल-४, पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) निवड नस्ती, पोल-३

D:\Mahesh\Pol-3\2011\May\GR